मृत बंदी नामदेव वैजीनाथ साबळे याच्या
जवळच्या नातेवाईकास मा. उच्च न्यायालय,
औरंगाबाद खंडपीठ यांचे आदेशानुसार
आर्थिक मोबदला देणेबाबत

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः COT-०९१५/प्र. क्र. ४५५/१५/तुरूंग-३

दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ३ ऑक्टोबर, २०१५

वाचा-

**१) क्रिमिनल रिट पिटिशन क्र. ६५७/२००९ प्रकरणी मा. उच्च न्यायालय, बॉम्बे, औरंगाबाद खंडपीठ यांचे दिनांक १४.७.२०१५ रोजीचे आदेश.**

प्रस्तावना-

मा. उच्च न्यायालय, बॉम्बे, औरंगाबाद खंडपीठ यांनी संदर्भाधीन आदेशान्वये मृत बंदी नामदेव वैजीनाथ साबळे, बीड जिल्हा कारागृह, बीड याच्या मृत्यूस शासन जबाबदार असल्याचा निर्णय देऊन उदरनिर्वाहासाठी बंद्यावर अवलंबून असणारी त्याची पत्नी व ३ मुले यांना रू. ५,००,०००/- (पाच लाख) नुकसानभरपाई, दिनांक २८.३.२००९ पासून शासन आदेश निर्गमित होण्याच्या दिनांकापर्यंत ९ % व्याज दराने अदा करण्याचे तथा सदर प्रकरणाचे न्यायालयीन शुल्क रू. २५,०००/- अदा करण्याचे आदेश दिले आहेत.

## शासन निर्णय-

मा. उच्च न्यायालय, बॉम्बे, औरंगाबाद खंडपीठ यांचे संदर्भाधीन आदेशास अनुसरून सदर मृत बंदी नामदेव वैजीनाथ साबळे याची पत्नी व ३ मुले यांना आर्थिक मोबदला म्हणून रू. ५,००,०००/- (पाच लाख), त्यावरील दिनांक २८.३.२००९ पासून शासन आदेश निर्गमित होण्याच्या दिनांकापर्यंत एकूण ६ वर्षे ६ महिन्यांचे ९% वार्षिक दराने रू. २,९२,५००/- व सदर प्रकरणाचे न्यायालयीन शुल्क रू. २५,०००/ असे एकूण रू. ८,१७,५००/- इतकी रक्कम यांना अदा करण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर आर्थिक मोबदला अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अधीक्षक, बीड जिल्हा कारागृह, बीड यांना प्राधिकृत करण्यात येत आहे मा. उच्च न्यायालय, बॉम्बे, औरंगाबाद खंडपीठ यांनी दिलेल्या आदेशानुसार आहरण व संवितरण अधिकारी यांनी आर्थिक मोबदल्याची रक्कम मा. मुख्य जिल्हा व सत्र न्यायाधीश, बीड यांचे कार्यालयात तातडीने अदा करुन त्याची पोचपावती शासनास सादर करावी.

याबाबतचा खर्च मागणी क्रमांक बी-५, मुख्य लेखाशीर्ष-२०५६, तुरुंग (००) १०१-"तुरुंग" (००) (०२) जिल्हा तुरुंग (२०५६ ००४४) ५० इतर खर्च (दत्तमत) या लेखाशीर्षाखालील सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर असलेल्या उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उपविभाग- दोन, अनुक्रमांक-२, नियम-७ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९२२१७३३२१२५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak Keshav Jadiye

Digitally signed by Deepak Keshav Jadiye
DN: CN = Deepak Keshav Jadiye, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Home Department
Date: 2015.10.03 16:37:25 +05'30'

**दीपक जडीये**
कक्ष अधिकारी, गृह विभाग

प्रत,

१. अपर पोलीस महासंचालक व पोलिस महानिरीक्षक (कारागृह), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. महालेखापाल -२, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. कारागृह उपमहानिरीक्षक, मध्य विभाग, औरंगाबाद
५. अधीक्षक, बीड जिल्हा कारागृह, बीड
६. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड
७. वित्त विभाग (व्यय ८), मंत्रालय, मुंबई
८. गृह विभाग (बीयुडी-१), मंत्रालय, मुंबई
९. गृह विभाग (तुरुंग-२), मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती तुरूंग-३